249

20110317173602001

**पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण**

पुणे जिल्हा शिक्षण मंडळाचे रामकृष्ण कला महाविद्यालय यांना पाथ-वे रुंदीकरणासाठी व पार्कींगसाठी पेठ क्र.२८ मधील भूखंड क्र.३०२ (४२४ चौ.मी.) जागा देण्यास मान्यता देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीएन ३००८/४५८/प्र.क्र.१६६/०८/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- ३१ मार्च, २००८**

**वाचा :-** मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे यांचे पत्र क्रमांक विप्रा/विभाग-२/७०५६, दिनांक १८ ऑक्टोबर,२००७ व त्यासोबतचा प्राधिकरण सभा क्रमांक २७२, दिनांक ११/८/२००७ चा विषय क्र.२ चा ठराव

**प्रस्तावना :--** पुणे जिल्हा शिक्षण मंडळाचे रामकृष्ण मोरे कला महाविद्यालय, पुणे या संस्थेला प्राधिकरणाचे पेठ क्र.२८ येथील माध्यमिक शाळेसाठी आरक्षित असलेला भूखंड क्षेत्र १५९८८.६ चौ.मी. यापूर्वीच दिनांक २०/२/७९ रोजी वाटप करण्यात आलेला आहे. सदर भूखंडामध्ये संस्थेचे माध्यमिक विद्यालय, कनिष्ठ कला व वाणिज्य विद्यालय कार्यरत आहे. या कला व वाणिज्य विद्यालय कार्यरत आहे. या कला व वाणिज्य महाविद्यालयाच्या प्रवेशव्दाराजवळच्या २४ मीटर रस्त्यावर विषयांकित भूखंड क्र.३०२ आहे. या संस्थेच्या प्रवेशव्दाराकडे येण्यासाठी मुख्य रस्त्यापासून ५ मी.चा पाथ वे आहे. पाथवेस लागून भूखंड क्र.३०२ आहे.संस्थेस जागेचे वाटप करतेवेळी शैक्षणिक प्रयोजनार्थ जागा वाटप केलेली होती, या संस्थेच्या प्रवेशव्दारा जवळील भूखंड क्र.३०२ हा निवासी असल्याने त्याचे वाटप त्यावेळी करण्यात आले नव्हते.

पुढे रामकृष्ण कला व वाणिज्य महाविद्यालयाची विद्यार्थी संख्या वाढल्यामुळे मुख्य रस्त्यापासून प्रवेशव्दाराला जोडणारा ५ मीटर रुंद पाथ-वे अपुरा पडत असल्याने मुख्य रस्त्यावर वाहतुकीची कोंडी होत आहे. या संदर्भात संस्थेने पेठ क्र.२८ भूखंड क्र.३०२ संस्थेच्या प्रवेशव्दाराकडे येणा-या पाथवेच्या रुंदीकरणासाठी आणि विद्यार्थ्यांच्या वाहनतळाच्या प्रयोजनासाठी सदर भूखंडाची मागणी प्राधिकरणाकडे दिनांक १४/८/२००७ चे अर्जान्वये केली. संस्थेच्या मागणीबाबत प्राधिकरण सभा क्र.२७२, दिनांक २१/८/२००७ मध्ये सविस्तर चर्चा होवून पेठ क्र.२८ मधील २४ मीटर रुंद मुख्य रस्त्यावरील वाहतुकीची कोंडी कमी करण्याच्या हेतूने संस्थेची मागणी विचारात घेऊन सदर भूखंड संस्थेस प्रचलित निवासी दराने वाटप करावा असे ठरविण्यात आले आहे. सदर संस्थेस वाटप करण्यात येणारा भूखंड क्र.३०२, पेठ क्र.२८ हा निवासी स्वरुपाचा आहे. प्राधिकरणाचे विकास नियंत्रण नियमावलीनुसार निवासी स्वरुपाचे जागेचा वापर सार्वजनिक सुविधेसाठी करता येतो. विकास नियंत्रण नियमावली १९७३ मधील भाग-३ नियम अनुक्रमांक ११ (३) प्रमाणे. पब्लीक युटीलिटी या सदात वाहनतळाचा वापर अनुज्ञेय आहे. त्यामुळे संस्थेच्या पाथवे रुंदीकरणाचा आणि विद्यार्थ्यांसाठी

वाहनतळाच्या वापरासाठी सदर भूखंडाचा वापर अनुज्ञेय राहील व सदर बाब अत्यावश्यक आहे. प्रस्तुत भूखंड निवासी स्वरुपाचाअसल्याने प्रचलित निवासी दराने वाटप करण्यात येणार आहे.

प्राधिकरण सभा क्र.२७२ च्या प्रस्तावात सदर भूखंडाचे वाटप करावे व नंतर शासनाची कार्योतर मान्यता घेण्यात यावी असा ठराव झाला आहे. त्यानुसार प्रशासनामार्फत सदर भूखंड वाटपाची कार्यवाही सुरु असून, प्रस्तुत ठरावानुसार उपरोक्त पेठ क्र.२८,भूखंड क्र.३०२ चे वाटप पुणे जिल्हा शिक्षण मंडळाचे रामकृष्ण मोरे कला महाविद्यालयास करण्यास शासनाने भूवाटप नियम १९७३ नियम ५ प्रमाणे मान्यता प्रदान करावी असा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, यांनी शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण सभा क्र.२७२, दि.११/८/२००७ मधील विषय क्र.२ अन्वये पारित झालेला ठराव पाहता मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी सादर केलेला प्रस्ताव विचारात घेवून पुणे जिल्हा शिक्षण मंडळाचे रामकृष्ण मोरे कला महाविद्यालय यांना "पाथ-वे" रुंदीकरणासाठी आणि विद्यार्थी वाहनतळ वापरासाठी पेठ क्र.२८ मधील भूखंड क्र.३०२ (४३४ चौ.मी.) हा सध्याचे प्रचलित निवासी दराने एक अत्यावश्यक बाब म्हणून वाटप करण्यास भू-वाटप नियमावली, १९७३ च्या नियम ५ अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**मा.राज्यपाल यांचे आदेशांनुसार व नांवाने,**

**( फ. ब. खान )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत --**

(१) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
(२) मा.प्रधान सचिव (नगर विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, न.वि.वि., मंत्रालय, मुंबई
(३) मा.विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे तथा अध्यक्ष, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
(४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
(५) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई